**सन २०१४-१५ करिता संचालन व प्रशासन अंतर्गत सामूहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड,ता.डहाणू, जि.ठाणे यांना ३१-सहाय्यक अनुदान वेतनेत्तर ६०% मर्यादेत लेखानुदानाव्दारे वितरीत अनुदान वजा जाता उर्वरित अनुदानास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साकृप्र २०१४/ प्र.क्र.२०७/का.३ अे**
मंत्रालय विस्तार,मुंबई.४०० ०३२
तारीख: - ०८ जानेवारी, २०१५

वाचा -

**१. कृषि व पदुम विभाग- शासन निर्णय क्र.लेखानु-२०१४/प्रक्र.३४/१४/२-अे, दि.९.४.२०१४**
**२. कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्र.साकृप-२०१४/प्र.क्र.२०७/३-अे, दि.२०.७.२०१४**

प्रस्तावना:-

राज्यातील विशेषत: आदिवासी शेतक-यांना नविन शेती तंत्रज्ञानाचा तसेच शेतीशी संलग्न दुग्धव्यवसाय,कुक्कुटपालन इ. विषयासंबंधी प्रशिक्षणाद्वारे माहिती व तंत्रज्ञान अवगत करुन देण्याच्या उद्देशाने ठाणे जिल्हयात सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल कार्यरत आहे. या संस्थेमार्फत सुरु असलेल्या कार्याचा आणि उपलब्ध सोयी सुविधांचा आदिवासी स्त्री-पुरुष शेतक-यांना चांगला लाभ होत असल्याचा अनुभव आल्यामुळे शासनाने सन १९७५ पासून कोसबाड येथील सामुहिक प्रशिक्षण केंद्र ही योजना १०० टक्के अनुदान तत्वावर गोखले एज्युकेशन संस्थेकडे सुपूर्द केली आहे.

२. गोखले एज्युकेशन संस्थेच्या सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे केंद्राच्या वेतनेत्तर खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी सन २०१४-१५ या वर्षात संचालक व प्रशासन अंतर्गत ३१- सहाय्यक अनुदान वेतनेत्तर करिता रुपये १.७१ लाख एवढी तरतुद करण्यात आली आहे. सदर तरतुदीच्या कार्यक्रमास शासन दि.२०-८-२०१४ च्या निणर्यान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच लेखानुदानाद्वारे मंजुर निधी रुपये ०.५६ लाख निधीच्या कार्यक्रमास दि.२०.८.२०१४ च्या शासन निणर्यान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या क्रमांक अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थसंकल्प-३,दिनांक१.७.२०१४ परिपत्रकान्वये सन २०१४-१५ च्या प्रथम आठमाही करता आवश्यक असणारा योजनेत्तर व योजनातंर्गत अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% मर्यादेत अर्थसंकल्पित अंदाज वितरण व संवितरण प्रणालीव्दारे वितरीत करावयाचा आहे. अशा सूचना दिल्या आहेत.

वित्त विभागाच्या सूचनेनुसार प्रस्तुत कार्यक्रमाच्या रु.१.७१ लक्ष एवढा अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६०% रु.१.०२६ लाख एवढी तरतूद आठमाहीकरिता वितरीत करणे आवश्यक आहे. त्यातील रु.०.५६ लाख एवढया निधीस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. उर्वरीत रु.०.४६ लक्ष एवढया निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

गोखले एज्युकेशन संस्थेच्या सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणेसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी संचालक व प्रशासन अंतर्गत ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या खाली ६०% मर्यादेत लेखानुदानाव्दारे वितरीत एकूण रु. ०.५६ लाख वजा जाता उर्वरीत रुपये ०.४६ लाख ( रुपये शेहचाळीस हजार फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ रु.०.४६ लाख एवढया निधीस होणारा खर्च सन २०१४-१५ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

मागणी क्रमांक - डी-३
२४०१-पीक संवर्धन
००१-संचालन व प्रशासन
(००)(०१)कृषि आयुक्तालय
(२४०१ ०१३६)
३१-सहाय्यक अनुदान वेतनेतर.

४ मंजुर निधी खर्च करतांना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचे अवलंबून /वित्तीय अधिकाऱ्याच्या मर्यादेत, सार्वजनि बाधकाम विभागाच्या मॅन्युअलचे अधिन राहून / सी.व्हि.सी. च्या मार्गदर्शक तत्वानुसार/सी.ए.जी.च्या निर्देशानुसार / प्रचलित शासन निर्णयानुसार /नियम /परिपत्रक/तरतुदीनुसार /बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

५ सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या ३८३/१४/व्यय-१, दि.२.१.२०१५ च्या अनौपचारिक संदर्भाच्या दिलेल्या मान्यतेनुसार तसेच मा.अपर मुख्य सचिव (कृषि) यांनी दिलेल्या मान्यतेनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०८१६३९३०५३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2015.01.08 16:48:17 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त,(कृषि) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे

२) संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे

३) सर्व मा. विधानमंडळ सदस्य.

४) विभागीय कृषि सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे

५) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,ठाणे जिल्हा,ठाणे

६) जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण विभाग,जिल्हा ठाणे

७) महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर

८) विभागीय आयुक्त,कोकण भवन,नवी मुंबई

९) मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.ठाणे

१०) वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय),मंत्रालय,मुंबई.३२

११) कार्यासन अधिकारी,२- अे,१५-अे,१६-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.

१२) प्रशिक्षण अधिकारी,सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,गोखले एज्युकेशन सोसायटी,

१३) कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे

१४) निवड नस्ती का-३अे